**वर्धा नदीवरील धानोरा प्रकल्पाचे (धानोरा बॅरेज व धानोरा-२ उपसा सिंचन योजना) उर्वरित सर्वेक्षण, संकल्पन व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/(२०६/२०१९) भाग-१/जसंअ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६/०४/२०२५

**संदर्भ :** १) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.६३५१/विपाविम/कां.ता५(१)/आमडीधानोराबॅरेज/ २०२३, दि.०३.१०.२०२३.

२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.३२९२/विपाविम/का.तां.५(१)/धानोरा बॅरेज/२०२४, दि. १६.०५.२०२४.

**प्रस्तावना:**

वर्धा नदीवरील धानोरा प्रकल्पामध्ये धानोरा बॅरेज व धानोरा-२ उपसा सिंचन योजनेचा समावेश आहे. सदर प्रकल्पाचा पाणी वापर हा सिंचन, पिण्यासाठी व औद्योगिक कारणासाठी होणार आहे. धानोरा बॅरेजचे सर्वेक्षण, अन्वेषण करून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या कामाकरिता यापूर्वी महामंडळ स्तरावर रु.६७.९७ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामध्ये सदरहू काम पूर्ण होऊ न शकल्याने उर्वरीत कामे पूर्ण करण्याकरिता विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचेकडून वॅपकॉस या संस्थेसोबत दि.२८.०६.२०१९ रोजी रु.७.३८ कोटी किंमतीचा सामंजस्य करार करण्यात आलेला आहे.

धानोरा बॅरेज व धानोरा उपसा सिंचन योजना ही एकत्रितपणे राबविण्याचे प्रस्तावित असून प्रस्तुत योजनेचे उर्वरित सर्वेक्षण, अन्वेषण करून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वर्धा नदीवरील धानोरा प्रकल्पाचे (धानोरा बॅरेज व धानोरा उपसा सिंचन योजना) ता. जि. चंद्रपूरचे उर्वरीत सर्वेक्षण, संकल्पन व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचे कामास जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित एकूण **रू. ५,४२,२०,२६२/-** (रू. पाच कोटी बेचाळीस लाख वीस हजार दोनशे बासष्ट फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

१) सदर प्रशासकीय मान्यता नुसार वॅपकॉस सोबत केलेल्या दि.२८.०६.२०१९ रोजीच्या सामंजस्य करारनामामध्ये सुधारणा करण्यात यावी.

२) जलसंपदा विभागाच्या प्रचलित बंदिस्त नलिका वितरण प्रणाली धोरणानुसार सर्वेक्षण,अन्वेषणाची कार्यवाही करावी.

सदर योजनेसाठीचा खर्च “४७०२- लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००)(०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (लहान पाटबंधारे) (कार्यक्रम) (४७०२ ५१०१)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३०/२४, दि.२६.०७.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०४१६१६०३४६३३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SAVITA
CHANDRASHEKHAR
BODHEKAR

Digitally signed by SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=c8ca43b8af581a3826084d1463fa7e004e47a9457ec0be246ec1b6e31297909a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2E11F2710D714EA0D63E58112977EFBE2A7E923B4738CFD1CF4206BF361E0575, cn=SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR
Date: 2025.04.16 16:04:31 +05'30'

**(सविता बोधेकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत : १) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री, जलसंपदा, (विदर्भ, तापी व कोकण खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
८) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
९) मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक.
१०) आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल (अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर.
१३) निवडनस्ती (जसंअ)